**नक्षलग्रस्त भागाच्या जलद विकासासाठी विशेष कृती कार्यक्रमांतर्गत राज्य तसेच विभागीय आयुक्त स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : नविका-२४१८/१६२७/प्र.क्र.१४८/का-१४१७**

मंत्रालय, मुंबई-३२

दिनांक : १ ऑक्टोबर, २०१९

वाचा : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक: इपीडी-२५१०/प्र.क्र.२९४/का-१४२१, दिनांक २२ जुलै, २०१० व दिनांक १८ ऑगस्ट, २०१०

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक: नविका-२४१८/१६२७/प्र.क्र.१४९/का-१४१७, दिनांक ११ मार्च, २०१९

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११ सप्टेंबर, २०१९

प्रस्तावना :

नक्षलग्रस्त भागाच्या जलद विकासासाठी विशेष कृती आराखडा तसेच पूरक आराखड्याच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर ३ पदे (उप संचालक-१, संशोधन अधिकारी-१, व सांख्यिकी सहायक-१) व राज्य स्तरावर (उप सचिव-१, संशोधन अधिकारी-१ व लिपिक टंकलेखक-१) अशी एकूण ६ पदे शासन निर्णय क्रमांक: इपीडी-२५१०/प्र.क्र.२९४/का-१४२१, दिनांक २२ जुलै, २०१० व सम क्रमांकाचे पूरकपत्र दिनांक १८ ऑगस्ट, २०१० अन्वये निर्माण करण्यात आली आहेत. संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक: नविका-२४१८/१६२७/प्र.क्र.१४८/का-१४१७, दिनांक ११ मार्च, २०१९ अन्वये अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०१९ ते दिनांक ३० सप्टेंबर, २०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदांना दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

नक्षलग्रस्त भागाच्या जलद विकासासाठी विशेष कृती कार्यक्रम तसेच पूरक कार्यक्रमांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे नमूद विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या ३ व राज्य स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या ३ अशा एकूण ६ अस्थायी पदांना दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**राज्य स्तरावर निर्माण करण्यात आलेली पदे**

| अ.क्र. | पदाचे नाव | पदाची संख्या |
|---|---|---|
| १ | उप सचिव | १ |
| २ | संशोधन अधिकारी | १ |
| ३ | लिपिक टंकलेखक | १ |
| | **एकूण** | **३** |

**विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर निर्माण करण्यात आलेली पदे**

| अ.क्र. | पदाचे नाव | पदाची संख्या |
|---|---|---|
| १ | उप संचालक | १ |
| २ | संशोधन अधिकारी | १ |
| ३ | सांख्यिकी सहायक | १ |
| | **एकूण** | **३** |

२. नियोजन विभागातील राज्य स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या ३ पदांसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक ओ-७,३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) (०१) नियोजन विभाग, योजनेतर (३४५१०१८२) दत्तमत, १ वेतन या लेखाशिर्षाखाली तसेच, विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या पदांसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०२) राज्य नियोजन यंत्रणेत वाढ करणे (०२) (०१) विभागीय आयुक्तांचे कार्यालय, नियोजन कक्ष योजनेतर (३४५१०३४२) दत्तमत, या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१९१००११७०७१३८०१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT DATTA BHANGLE

Digitally signed by HEMANT DATTA BHANGLE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=31cc357a98de35264e3f32a02a11a5f444ac03f702947b9db1e018f1ec6ec357, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=3e3482a3b78b132fd024af2073b3b3aa28fe67898c829b2dc628c953bb336e14, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=HEMANT DATTA BHANGLE
Date: 2019.10.03 11:50:31 +05'30'

**(हेमंत भांगले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर

२. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
३. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
६. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली/गोंदिया/चंद्रपूर/भंडारा
७. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
८. उपआयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर
९. कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (का-१४२१/१४२२/१४२४), मंत्रालय, मुंबई
१०. वित्त विभाग, (अर्थ संकल्प-१६/व्यय-८/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२